2010102214515200।

**पुणे शहर महानगरपालिका**

पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर विविध संवर्गातील पदे नव्याने निर्माण करणे.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,

शासन निर्णय क्र.पीएमसी-३००९/२२४/प्रक्र-६३६/०९/नवि-२२

मंत्रालय, मुंबई- ४०००३२,

**दिनांक:-** ०७ ऑक्टोबर, २०१०

**वाचा :** १) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांचे पत्र मआ/उआ(जि.घ.)/से/२२०८, दि. १.११. २००८ व त्यासोबचे स्थायी समिती ठराव क्र. १८६७ दि. १६.०२.२००८ व महासभा ठराव क्र. १४० दि. २३.७.२००८

२) मुख्य उद्यान अधिक्षक (सेवकवर्ग विभाग), पुणे महानगरपालिका, पुणे यांचे पत्र क्र. उका /से /३३२२,दि. १२.०२.२००९

३) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांचे पत्र मआ/से/८५३, दि. १६/०७/२००९.

४) या विभागाचा समक्रमांकाचा दि. ३१ ऑगस्ट, २००९ रोजीचा शासननिर्णय व दि.२९.०५.२०१० चे शुध्दीपत्रक

५) उपआयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांचे पत्र उआ/से/४०६७, दि. २०.०३.२०१०

६) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांचे पत्र मआ/से/२४७, दि. २०.४.२०१०

**प्रस्तावना:-**

पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर विविध संवर्गातील काही पदे नव्याने निर्माण करण्यासाठी आणि महानगरपालिकेच्या अभियांत्रिकी सेवा संवर्गातील पदांची पदनामे व वेतनश्रेण्या शासनाकडील अभियांत्रिकी सेवा संवर्गातील समकक्ष पदनामांशी आणि वेतनश्रेण्यांशी सुसंगत करण्याबाबत स्थायी समिती ठराव क्र. १८६७ दि. १६.०२.२००८ व महासभा ठराव क्र. १४० दि. २३.७.२००८ हे ठराव पारीत केले आहेत. त्याअनुषंगाने आयुक्तांनी सादर केलेल्या प्रस्तावातील वस्तुस्थिती विचारात घेवून शासनाने पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर विविध संवर्गातील **काही पदे नव्याने निर्माण** करण्यास आणि अभियांत्रिकी सेवा संवर्गातील कनिष्ठ अभियंता या निम्न स्तरावरील पदांपासून नगर अभियंता या वरिष्ठ स्तरावरील पदांपर्यत पदनामात आणि वेतनश्रेणीत सुसंगता/सुसुत्रता आणण्यासाठी, महानगरपालिकेच्या अभियांत्रिकी सेवा संवर्गातील पदांची **पदनामे व वेतनश्रेण्या** शासनाकडील अशा पदांशी सुसंगत करुन सुधारीत करण्यास संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. संदर्भाधीन क्र. ५ व ६ येथील पत्रान्वये आयुक्त, पुणे शहर महानगरपालिका, पुणे यांनी, पुणे महानगरपालिका सेवकवर्गाचे तक्ता सन २००८-२००९

मधील सुचविलेल्या जागांना शासनाची मंजूरी देण्याची पुन:श्च विनंती केली आहे. त्या अनुषंगीक बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील वस्तुस्थिती आणि महानगरपालिकांचे वर्गीकरण, आस्थापना खर्च इत्यादी बाबी विचारात घेवून, पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अभियांत्रिकी सेवा संवर्गात पाणी पुरवठा व स्वच्छता/मलनिस्सारण विषयक कामकाज हाताळण्यासाठी अभियंत्यांचा समर्पित संवर्ग (Dedicated cadre) निर्माण करण्याच्या अटीवर **"अतिरिक्त शहर अभियंता (पथ)"** (रु. १४३००-४००-१८३०० या वेतनश्रेणीत) या अभिनामाचे एक पद नव्याने निर्माण करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम-५१ (४) अन्वये प्राप्त अधिकारात शासनाची मान्यता देण्यात येत आहे .

०२. शासनाने पुणे महानगरपालिकेस पाठविलेले प्रारुप सेवा प्रवेश नियम (Model Recruitment Rules) या महानगरपालिकेने स्विकृत करुन त्यास शासनाची मान्यता मिळाल्यानंतर या प्रस्तावातील इतर पदे नव्याने निर्माण करण्याचा निर्णय घेण्यात येईल.

०३. सदरील आदेशानुषंगाने आयुक्त, पुणे शहर महानगरपालिका,पुणे यांनी सर्व आवश्यक त्या बाबीची पूर्तता करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नांवाने.

०७/१०/२०१०

(सुनिल कोठेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
३) मा.सचिव (२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) आयुक्त, पुणे शहर महानगरपालिका, पुणे
५) अतिरिक्त आयुक्त(जनरल), पुणे शहर महानगरपालिका, पुणे
६) उपायुक्त (सेवकवर्ग) (जनरल), पुणे शहर महानगरपालिका, पुणे
७) कक्ष अधिकारी, (संगणक शाखा), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
८) निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२

---------*------------*---------------*--------------*---------

D:\P U N E\POST CREATION\new post Creation\उGR pa to comm.doc